**सन २०२२-२३ मधील राष्ट्रीय कृषि विकास योजना - कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) या योजनेच्या सर्वसाधारण प्रवर्गाकरिता चौथ्या हप्त्याचा रु. १३० कोटी निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र.राकृवि-२०२२/प्र.क्र.१९४/१४-अे**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२३.

**संदर्भ :** १. प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या केंद्र शासनाने सन २०२१ करिता निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.

२. कृषि व शेतकरी कल्याण विभाग,कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.5-1/2022-RKVY,दि.०६ /०४/२०२२.

३. कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.7-2/2022-RKVY, दि.०७ /०४/२०२२.

४. राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया (वार्षिक कृती आराखडा आधारित) राज्यस्तरीय मंजुरी समितीच्या (SLSC) दि.०५/०७/२०२२ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

५. कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.7-१/2022-RKVY, दि.१२ जुलै,२०२२.

६. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-२०२२/प्र.क्र.१९३/१४-अे, दि. ०८ सप्टेंबर, २०२२

७. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-२०२२/प्र.क्र.१९४/१४-अे, दि. १५ सप्टेंबर, २०२२.

८. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-२०२२/प्र.क्र.१९४/१४-अे,दि. १२ जानेवारी, २०२३.

९. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि-२०२२/प्र.क्र.१९४/१४-अे,दि. ०८ मार्च, २०२३

१०. कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.18-10/2020/RFS-III, दि.२४ मार्च, २०२३.

११. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/फलो-४/नि.मा./१६५/२०२३, दि. २७ मार्च, २०२३.

**प्रस्तावना :**

सन २०१५-१६ पासून प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पीक घटकाची अंमलबजावणी राज्यात करण्यात येत असून यामध्ये सूक्ष्म सिंचन व पाणी व्यवस्थापनाच्या पूरक बाबी अशा दोन उप घटकांचा समावेश आहे.

केंद्र शासनाच्या दि.०७ एप्रिल,२०२२ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजना-रफ्तार ची राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया या नावाने पुनर्रचना केली असून त्यामध्ये वार्षिक कृती आराखडा आधारित व सविस्तर प्रकल्प अहवाल आधारित या दोन शाखांचा समावेश आहे. प्रधानमंत्री

कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटक ही योजना राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरियाच्या वार्षिक कृती आराखडा आधारित शाखेत अंतर्भूत केली असून केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०:४० असे आहे.

राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) या योजनेकरिता सन २०२२-२३ करिता रु.६६६.६७ कोटी (केंद्र हिस्सा रु.४०० कोटी + राज्य हिस्सा रु.२६६.६७ कोटी ) निधीच्या कार्यक्रमास संदर्भ क्र.७ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली असून योजनेकरिता प्राप्त पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या हप्त्याचा निधी अनुक्रमे संदर्भ क्र. ७, ८ व ९येथील शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यात आलेला आहे.

केंद्र शासनाने संदर्भ क्र. १० अन्वये राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) या योजनेकरिता सर्वसाधारण प्रवर्गाचा चौथ्या हप्त्याचा रु.७८ कोटी निधी वितरीत केला आहे. त्यानुषंगाने योजनेसाठी मंजूर तरतुद व वितरणासाठी उपलब्ध असलेल्या निधीच्या मर्यादेत केंद्र हिश्श्याचा चौथ्या हप्त्याचा रु.७८ कोटी व त्या समरूप राज्य हिश्श्याचा रु.५२ कोटी असा एकूण रु. १३० कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. सन २०२२-२३ करिता राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गासाठीचा चौथ्या हप्त्याचा केंद्र हिश्श्याचा रु.७८ कोटी (रुपये अठ्ठ्याहत्तर कोटी फक्त) व त्या समरुप राज्य हिश्श्याचा रु.५२ कोटी (रुपये बावन्न कोटी फक्त) असा एकूण रु.१३० कोटी (रुपये एकशे तीस कोटी फक्त) निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च पुढील लेखाशिर्षाखालील सन २०२२-२३ करिताच्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्र. डी-३<br>२४०१ पीक संवर्धन<br>११३, कृषि अभियांत्रिकी<br>(००)(०७) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) (कें.पु.यो.) (केंद्र हिस्सा ६०%) (सर्वसाधारण) (कार्यक्रम)<br>(२४०१२५०४), ३३, अर्थसहाय्य | मागणी क्र. डी-३<br>२४०१ पीक संवर्धन<br>११३, कृषि अभियांत्रिकी<br>(००)(२१) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना-प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) (कें.पु.यो.) (राज्य हिस्सा ४०%) (सर्वसाधारण) (कार्यक्रम)<br>(२४०१ए९९६), ३३, अर्थसहाय्य |

३. सदर निधीचे वितरण करण्याकरिता आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी व सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक योजनेच्या मार्गदर्शक सूचना व संदर्भ क्र. ६ अन्वये दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर योजनेच्या लाभार्थ्यांची निवड महा-डीबीटी प्रणालीद्वारे करण्यात यावी व लाभार्थ्यांना अनुदानाचे वाटप आधार संलग्न बँक खात्यावर करण्याकरिता सार्वजनिक वित्त व्यवस्थापन प्रणालीचा वापर करावा.

६. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठवावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४ एप्रिल,२०२२ व दि. ०८ फेब्रुवारी, २०२३ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर परिपत्रकातील अटी व शर्तीची पूर्तता करुन तसेच वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.१११/२३/व्यय-१, दि. ३१/०३/२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३३११४०९२४२००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by KARAD SANTOSH BANSIRAO
Date: 2023.03.31 14:14:41 +05'30'

**(संतोष ब. कराड)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (कृषि), कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व),
७. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई,
९. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर,
१०. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर,
११. वित्त विभाग (व्यय- १४/अर्थसंकल्प १३), मंत्रालय मुंबई,
१२. नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई,
१३. निवडनस्ती.